**भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सन २०२०-२१ मध्ये राबविण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गासाठी रुपये २०.०० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : फुंफला-२०२०/प्र.क्र.१२८/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २९ जुलै, २०२०

**संदर्भ:-**

१. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक:राफयो-२०१८/प्र.क्र.४७/९-अे, दिनांक ०६.०७.२०१८
२. संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेले जा.क्र. कृआ/फलो-२/भा. फुंडकर योजना/२०-२१/१२१५९/२०, दिनांक २१ एप्रिल, २०२० चे पत्र.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४ मे, २०२०
४. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: फुंफला-२०२०/प्र.क्र.१२८/९-अे, दिनांक २९ जून, २०२०

**प्रस्तावना:-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत जे शेतकरी फळबाग लागवडीकरिता पात्र ठरु शकत नाहीत अशा शेतकऱ्यांसाठी राज्य शासनाने उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सुरु केली आहे. संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाने कोविड-१९ च्या संसर्गजन्य रोगामुळे सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत वित्तीय उपाययोजना करण्याचे निर्देश दिले आहेत. या पार्श्वभूमीवर संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ मध्ये अर्थसंकल्पित तरतूदीच्या ३३ % च्या मर्यादेत सदर योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता सदरहू योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गासाठी निधी वितरणाची बाब विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे..

**शासन निर्णय:-**

१. राज्यात भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेची सन २०२०-२१ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी सन २०२०-२१ मध्ये अर्थसंकल्पित तरतूदीच्या ३३ % मर्यादेत प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून तुर्तास सर्वसाधारण प्रवर्गासाठी अर्थसंकल्पित तरतूदीच्या २० % म्हणजे सर्वसाधारण प्रवर्गासाठी सन २०२०-२१ साठी अर्थसंकल्पित केलेल्या रुपये १००.०० कोटी रक्कमेपैकी रुपये २०.०० कोटी एवढा निधी वितरणास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खालील लेखाशिर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.
मागणी क्रमांक डी-३,
२४०१- पिक संवर्धन
११९, बागायती व भाजीपाला पिके, (०१) फळे (३३),
भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना
(२४०१ A८८९) ३३ अर्थसहाय्य

३. चालू वर्षी या योजनेंतर्गत निधी उपलब्ध करुन दिल्यानंतर तो प्रथमत: सन २०१८-१९ व सन २०१९-२० या वर्षातील प्रलंबित प्रकरणांसाठी वापरण्यात यावा. नवीन दायित्व निर्माण करु नये.

४. सदर योजनेची संदर्भ क्रमांक १ येथे नमूद शासन निर्णय, सदर शासन निर्णयामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणा व संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयातील तरतुदींच्या अनुषंगाने अंमलबजावणी करावी.

५. या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आंहरण व वितरण करण्याकरिता सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, आयुक्त (कृषी) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर योजनेंतर्गत अनुदान लाभार्थ्यांना त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट लाभ हस्तांतरण (डीबीटी) द्वारे अदा करण्यात यावे.

७. या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने आयुक्त (कृषी) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

८. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्तीचे तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११७/२०२०/व्यय-१, दिनांक १७.०७.२०२० अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००७२९१५५६५९०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.07.29 15:30:26 +05'30'

**( अशोक आत्राम )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२. मा. राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३. मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-४०० ०३२.
४. सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. मा. अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७. मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. सचिव (कृषी), कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.सर्व विभागीय कृषी सह संचालक, महाराष्ट्र राज्य.
१२.सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१३.सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
१५.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६.संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
१७.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१८.सह संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई-४०० ०३२
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२०. कक्ष अधिकारी (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२१. कक्ष अधिकारी (२-अे), कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२२. निवड नस्ती ९-अे.